**अल्पसंख्याक बहुल क्षेत्रामध्ये अल्पसंख्याक महिलांसाठी राबविण्यात येत असलेल्या स्वयंसहायता बचत गट योजनेस मुदत वाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः- अविवि-२०२०/प्र.क्र.२५/का-९**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : ०१ ऑक्टोबर, २०२०

**वाचा:-** (१) अल्पसंख्याक विकास विभाग शासन निर्णय क्र अविवि-२००९/प्र.क्र.१४/ का-९/दि.२८.०२.२०१२.

(२) अल्पसंख्याक विकास विभाग शासन निर्णय क्र अविवि-२००९/प्र.क्र.१४/ का-९/दि.०९.०३.२०१४

**प्रस्तावना:-**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील १२ शहरामध्ये मुस्लीम, जैन, बौध्द, खिश्चन,शीख,पारशी आणि ज्यू या अल्पसंख्याक समाजातील महिलांना विकासाच्या मुख्य प्रवाहात आणून त्यांना सक्षम बनविण्यासाठी पुर्वीपासून महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत अल्पसंख्याक समाजातील महिलांचे स्वयंसहाय्यता बचत गट स्थापन केले आहे. यापाठीमागे अल्पसंख्याक घटकातील महिलांना संघटीत करणे, त्यांना पतपुरवठयाची संधी उपलब्ध करुन देणे तसेच उद्योजकीय विकासाची संधी तसेच माहिती व ज्ञानाचा स्त्रोत उपलब्ध करुन देणे हा यापाठीमागील उद्येश आहे. यासाठी मुंबई शहर, मुंबई उपनगर,नांदेड, मालेगाव (नाशिक)कांरजा (वाशिम), परभणी,पुणे,नागपूर,औरंगाबाद,भिंवडी,मुंब्रा-कौसा(ठाणे) आणि मिरज (सांगली) अश्या १२ शहरातील अल्पसंख्याक लोकसमुहातील महिलांचे स्वयंसहाय्यता बचतगट स्थापन करण्याबाबत संदर्भ क्र.१ वरील दि.२८.२.२०१२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली.

२. संदर्भ क्र.१ वरील दि २८.०२.२०१२.च्या शासन निर्णयान्वये राज्यातील अल्पसंख्याक समुदायातील महिलांचे बचतगट स्थापन करण्यास, बचतगटांना बळकटीकरण करण्याकरिता शासनाने स्वयंसहाय्यता बचत गटांच्या निर्मितीसाठी महिला आर्थिक विकास महामंडळास “शिखर संस्था” म्हणून घोषित केले असल्याने, “अल्पसंख्याक समाजातील महिलांसाठी स्वयंसहाय्यता बचत गट योजना” ही योजना महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत राबविण्यात येत आहे.

महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत खालील उपक्रम राबविले आहेत.

- बचतगटातील सदस्यांना आवश्यकतेनुसार विविध प्रकारच्या क्षमतावृध्दीचे प्रशिक्षण देणे.
- स्वयंसहाय्यता बचतगट संकल्पना राबविणे.
- या बचतगटांची लेखे ठेवणे.

- बचतगटातील सदस्यांनी नेतृत्ववृध्दीचे प्रशिक्षण देणे.
- गटांची प्रतवारी करणे.
- या गटांमध्ये कार्यत्मक साक्षरता वृध्दीगत करणे.
- लिंग समभाव संचेतनाचे प्रशिक्षण देणे.
- औपचारिकीय वित्तीय संस्थांच्या माध्यमातून महिलांना लघुपतपुरवठा उपलब्ध करणे.
- उद्योजकीय जाणीव जागृतीचे प्रशिक्षण.
- निवडक महिलांना कौशल्यावर आधारित उद्योजकाचे प्रशिक्षण.
- बचतगटांना बँकाशी सलग्न करणे व त्यांना कर्ज परतफेडीसाठी प्रोत्साहीत करणे.
- बचतगटांच्या वृध्दीसाठी इतर आवश्यक त्या उपाययोजना.

या करिता सदर शासन निर्णयान्वये राज्यातील अल्पसंख्याक समुदायातील महिलांचे बचतगट स्थापन करण्याचा सविस्तर कृती आराखडा महिला आर्थिक विकास महामंडळा मार्फत तयार करण्यात आला. त्याची कार्यपुर्ती अपेक्षित साध्यता व या योजनेतंर्गत स्थापन केलेले बचतगट व त्यानुषंगाने निर्धारित उद्दिष्टे याचा तपशिलवार आराखडा निश्चित करण्यात आला होता. या कृती आराखडयानुसार कार्यवाहीचा कालावधी ८ वर्षासाठी निश्चित करण्यात आला होता. त्याची मुदत दि.३१.०३.२०२० पर्यत निश्चित केलेली होती. यापुढेही अल्पसंख्याक बहुल क्षेत्रामध्ये अल्पसंख्याक समाजातील महिलांसाठी स्वयंसहाय्यता बचतगट योजना राबविण्यासाठी महिला आर्थिक विकास महामंडळास मुदतवाढ देण्यात यावी अशी विनंती महिला आर्थिक विकास महामंडळाने त्यांच्या दि.१८.०३.२०२० च्या पत्रान्वये शासनास केली असून याबाबत पुढील ५ वर्षाचा कृती आराखडा व खर्चाचे अंदापत्रक दि.०७.०८.२०२० च्या पत्रान्वये सादर केले आहे.सदर योजनेस पुढील ५ वर्षाकरीता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय-</u>**

राज्यातील अल्पसंख्याक बहूल क्षेत्रामधील अल्पसंख्याक समाजातील महिलांसाठी शासन निर्णय दि.२८.०२.२०१२ अन्वये राबविण्यात येत असलेल्या स्वयंसहाय्यता बचतगट योजनेस दि.०१.०४.२०२० ते ३१.०३.२०२५ पर्यत ५ वर्षाकरीता मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर योजना महिला आर्थिक विकास महामंडळा मार्फत राबविण्यात येत आहे. पुढे देखील ५ वर्षाच्या कालावधीकरीता सदर योजना महिला आर्थिक विकास महामंडळा मार्फत राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

- पुढील ५ वर्षाचा कृती आराखडा -महिला आर्थिक विकास महामंडळाने खालील प्रमाणे पुढील ५ वर्षात (दि.०१.०४.२०२० ते दि. ३१.०३.२०२५) पुढीलप्रमाणे कार्यक्रमांची उद्दिष्टपूर्ती करावी.

### कार्यक्रमाची उद्दिष्ट

| अ.क्र. | तपशील | पुढील ५ वर्षाकरीता कार्याक्रमाचे उद्दिष्टे |
|---|---|---|
| १ | एकूण बचतगट | ८०० |
| २ | एकूण संघटीत करावयाच्या महिला | ८,८०० |
| ३ | स्थापन करण्यात येणा-या वस्तीस्तर संघाची संख्या | ७० |
| ४ | बँक मित्र निवड व क्षमता बाधणी(CMRCस्तरावर प्रती CMRC ०५ प्रमाणे ) | ६५ |
| ५ | लोकसंचलित साधन केंद्र (Community Managed Resource Centre (CMRC) | सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या १३ लोकसंचलित साधन केंद्रे (CMRC) शास्वत संस्था म्हणून उभ्या करणे |
| ६ | Social Enterprises (CMRCस्तरावर प्रती CMRC ०२ प्रमाणे ) | २६ |

**उपरोक्त उद्दिष्ट साध्य करुन योजनेचे सर्वसाधारण स्वरुप खालील प्रमाणे राहिल-**

१. **<u>योजनेचा कालावधी:</u>**१ -१एप्रिल,२०२० ते ३१ मार्च,२०२५ (५ वर्ष)

२. **<u>नवीन बचतगट निर्मितीचे उदिष्ट:</u>** ८०० -बचतगट

नव्याने तयार होणा-या ८०० बचतगटाव्दारे ८८०० महिलांचे संघटन उभे करण्यात येणार आहे. नवीन बचत गटातील महिलांना संकल्पना प्रशिक्षण व बुक किपिंगचे प्रशिक्षण देण्यात येईल. तर जुन्या गटातील सभासदांची व्यवसायीक कौशल्य वृदधी करण्याच्या अनुषंगाने जुन्या गटातील (३२०० गटांपैकी) प्रती गट ५ या प्रमाणे एकूण १७००० सदस्यासाठी अभ्यास दौ-याचे आयोजन करण्यात येईल. तसेच गटाच्या मासिक बैठकांमधून गटाच्या व्यवहाराबाबत व शिस्तीबाबत प्रशिक्षण देण्यात येईल. नवीन व जुन्या गटांना बॅकेमार्फत पतपुरवठा व वैयक्तिक उद्योगाना चालना देण्यात येईल.

३. <u>लोकसंचलित साधन केद्राची उभारणी (</u>Community Managed Resource Centre – CMRC)

सद्यस्थितीत १३ लोकसंचलित साधन केद्राची स्थापना करण्यात आलेली आहे. त्या CMRC बळकट करणे व स्वायत्त संस्था म्हणून कार्यरत राहण्याच्या दृष्टीने विकसित करणे त्याचबरोबर अमरावती जिल्ह्यात नवीन एक CMRC स्थापन करण्याचे प्रस्तावित

आहे.त्याकरीता र१.९६ कोटी एवढी अतिरिक्त अंदाजपत्रकीय तरतूद अपेक्षित आहे. सद्यस्थितीत बचतगटांना CMRC मार्फत पुरविण्यात येणा-या सेवा व त्यासाठीचे सेवाशुल्क या व्दारे CMRC उत्पन्न कमवित आहे. सद्यस्थितीत CMRC हया ३० ते ५० टक्के पर्यत त्याचा व्यवस्थापन खर्च भागविण्यास सक्षम झालेल्या आहेत.CMRC या प्रकल्प कालावधी नंतरही चिरकाल टिकूण राहण्याच्या अनुषंगाने त्यावर पुढील कालावधीत गुंतवणूक करण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे.त्यामुळे CMRC चे उत्पन्न हळूहळू वाढेल व कार्यक्रम संपेपर्यत त्या स्वताच्या पायावर उभ्या राहतील. याकरीता CMRC साठी अंदाजपत्रकामध्ये १० टक्के दरवर्षी घसरत्या क्रमाने कार्यक्रमातून व्यवस्थापन खर्चासाठी निधी देण्यात येईल.

४. **बँक मित्रः-** बचत गटांना बॅकेमार्फत कर्ज उपलब्ध करणे सुलभ व्हावे यासाठी CMRC स्तरावर प्रति CMRC बॅक मित्राची निवड करुन त्यांना विविध ५ या प्रमाणे ६५ टप्प्यावर प्रशिक्षण देण्यात येईल.

५. जागतिक महिला दिन साजरा करण्यासाठी प्रति वर्षी महिला मेळाव्याचे आयोजन करणे .

६. स्त्री पुरुष समानता व लिंग संवेदनशिलता जागरुक करण्याच्या उद्येशाने प्रति वर्षी कार्यशाळेचे आयोजन करण्यात येईल .

७. **कर्मचारी प्रशिक्षणः-** व्यवस्थापक, लेखपाल यांना प्रकल्प कालावधीमध्ये एकूण २८ दिवस तर सहयोगिणी यांना २२ दिवस गरजेनुसार टप्प्या टप्याने प्रशिक्षण देण्यात येईल.

८. **वस्तीस्तरीय समिती सदस्यांना प्रशिक्षणः-** वस्तीपातळीवर गठीत करण्यात आलेल्या वस्ती स्तरीय समिती सदस्यांना व गर्व्हनिंग बॉडी ला त्यांच्या भूमिका व जबाबदाऱ्या, ALF (Area Level Federation) व्यवस्थापन, नेतृत्व विकास या विषयांबाबतचे प्रशिक्षण देण्यात येईल.

९. मौलाना आझाद आर्थिक विकास महामंडळामार्फत बचतगटाना प्रति वर्ष रु ५.कोटी एवढे कर्ज वाटप करण्याचे प्रस्तावित आहे. याकरीता कर्ज वाटपासाठी गटाची निवड करणे व कर्ज परतफेड करण्याकरीता पाठपुरावा करणे हे काम CMRC मार्फत करण्यात येईल. त्याचबरोबर जुन्या (सद्यस्थितीत कार्यरत ) बचत गटानी घेतलेल्या कर्जाची परत फेड केली नसल्यास अशा बचत गटांना कर्ज परत फेड करण्याबाबतचा पाठपुरावा देखील CMRC मार्फत करण्यात येईल.

१०. **उद्योजकीय प्रशिक्षण:-** उद्योजकीय प्रशिक्षणाकरीता International labour Organization (ILO) या तज्ञ संस्थेने विकसित केलेल्या “उद्योजकता विकास प्रशिक्षण” CYB ( Genrate Your Business idea )-२५६००महिला,SYB (Start Your Business-४८०० महिला व IYB ( Improve Your Business )-१६०० महिला अशा एकूण ३२००० महिलांना या मोडयूल च्या आधारे प्रशिक्षण देण्याचे नियोजन आहे. या मोडयूलच्या आधारे प्रशिक्षण देण्याकरीता महिला आर्थिक विकास महामंडळामध्ये साधन व्यक्ती विकसित करण्यात आलेले आहेत. म्हणजेच माविमच्या Inhouse expertise मार्फत हे प्रशिक्षण कार्यक्रम घेण्यात येईल.

११.औद्योजिकीय प्रशिक्षणाबरोबरच बचत गटातील महिला सदस्यांना त्यांची शैक्षणिक पात्रता वाढविण्याचे प्रोत्साहन देण्याकरीता महिला आर्थिक विकास महामंडळ प्रयत्नशिल राहील. ज्यामुळे सदर बचत गटातील महिला सदस्यांना अंगणवाडी सेविका, आशा वर्कर्स या सारख्या पदांवर नियुक्ती करीता त्यांना संधी प्राप्त होईल.

१२.बचतगटातील महिलाचे आरोग्य व पोष्टीक आहार याबाबत जागरुकता निर्माण करण्यासाठी महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत आरोग्य शिबिराचे आयोजन करण्यात येईल.

**१३.**सन २०१२ पासून सन २०२० पर्यत निर्माण झालेले ३२०० बचत गट बळकट करणे आवश्यक आहे.तसेच सदर बचत गटांना नवनवीन उद्योग कौशल्याचे प्रशिक्षण देऊन सद्यस्थितीत चालू असलेल्या उद्योग व्यवसायाचा विकास करणे व त्यामध्ये नवनवीन तंत्रज्ञानाचा वापर करुन आधुनिक युगाशी स्पर्धा करु शकेल असे कौशल्य बचतगटामधील सदस्यांनी आत्मसात करणे आवश्यक आहे. उदा. मार्केटीग, जाहिरात, लेबलिंग पॅकेजिग इ.बाबी सदस्थितीत कार्यरत असलेल्या ३२०० बचत गटामध्ये अंतर्भूत करुन सदर बचत गट बळकट करणे व त्यांच्या उद्योगव्यवसायातील सातत्य टिकविणे या बाबी देखील पुढील ५वर्षाच्या कार्यक्रमामध्ये सामाव करण्यात येतील. नवीन निर्माण करण्यात येणा-या ८०० बचत गटांसोबतच कार्यरत असलेल्या ३२०० बचत गटातील सदस्यांना महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत घेण्यात येणा-या विविध उपक्रमामध्ये सामाविष्ट करण्यात येईल.

**१४.सदर कार्यक्रमासाठी ५ वर्षात येणाऱ्या खर्चाची संक्षिप्त माहिती :-**

| अक्र. | घटक | एकूण प्रस्तावित अंदाजपत्रकीय तरतूद (रु कोटी) |
|---|---|---|
| १ | संस्थात्मक उभारणी | १२.१२ |
| २ | लघुपत पुरवठा सेवा | १.६७ |
| ३ | उपजीविका विकास व लघुद्योग व पणन विकास | १०.९३ |
| ४ | आरोग्य सेवा सुधारण्यासाठी उपक्रम | ०.५९२ |
| ५ | विशेष उपक्रम | ०.८८ |
| ६ | प्रकल्प व्यवस्थापन | ६.०८८ |
| ७ | माविम संस्थात्मक | १.६१४ |
| | एकूण प्रकल्प खर्च | ३३.९० |
| | या पैकी प्रकल्पातून प्रस्तावित निधी (७६%) | २५.६२ |
| | या पैकी लोक सहभाग निधी (२४%) | ८.२८ |

सदर ५ वर्षाच्या कार्यक्रमाकरीता अपेक्षित रु.३३.९० कोटी पैकी लोकसहभागातून रू.८.२८ कोटी निधी वगळता रु.२५.६२ कोटी व अमरावती जिल्ह्याकरीता नवीन CMRC करीता रु.१.९६कोटी असे एकूण रु.२७.५८ कोटी खर्च अपेक्षित आहे. सदर योजनेच्या ५ वर्षातील अंमलबजावणीच्या दृष्टीने योजनेंतर्गत प्रत्येक वर्षी आवश्यकतेप्रमाणे महिला आर्थिक विकास महामंडळास शासनाकडून निधी उपलब्ध करून देण्यात येईल. निधी वितरणाबाबत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येईल.

या अंतर्गत होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण,२०० इतर कार्यक्रम (०१)(१०) स्वंय सहायता गटाकरीता सहायक अनुदान (२२३५ ए १६९) ३१ सहायक अनुदान" या लेखाशिर्षाखाली त्या त्या वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.सदर योजनेतंर्गत शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या अनुदानाच्या विनीयोगाबाबतचे उपयोगीता प्रमाणपत्र महिला आर्थिक विकास महामंडळाने शासनास सादर करावे.

हा शासन निर्णय नियोजन विभाग व महिला व बाल विकास विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या मान्यतेने वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. १७०/२०२०/व्यय-१ दि.९.९.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२०१००११४५७०३५०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.10.08 14:56:32 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. संबंधित विभागीय आयुक्त,
१० संबंधित जिल्हाधिकारी,
१०.मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
११.कक्ष अधिकारी, (का-७ ),अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.